**श्री. सुमंत नंदनवनकर, विद्युत निरीक्षक यांचे सार्वजनिक बांधकाम विभागात समावेशन करण्यासाठी दि. ३० जून, २०१७ रोजी कार्यमुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र. मुविनी-२०१६/प्र.क्र.५८/ऊर्जा-५**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १७ जून, २०१७

वाचा :- १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनी-२०१६/प्र.क्र.५८/ऊर्जा-५ दि. ३० मार्च, २०१६.

२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शुध्दीपत्रक क्र. मुविनी-२०१६/प्र.क्र.५८/ऊर्जा-५ दि. ३० एप्रिल, २०१६.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णयांन्वये ऊर्जा विभागाकडील विद्युत निरीक्षणालयाची आस्थापना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणल्यानंतर विद्युत निरीक्षणालयांतर्गत कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांनी मुख्य विद्युत निरीक्षक यांचे मार्फत सार्वजनिक बांधकाम विभागात समावेशन करण्यासाठी दिलेले विकल्प, त्यांची सेवाजेष्ठता, मंजूर संवर्ग व संवर्गनिहाय रिक्त पदसंख्या याबाबी विचारात घेऊन, त्यांचे ऊर्जा विभागातून सार्वजनिक बांधकाम विभागात समावेशन करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र. २ येथील शुध्दीपत्रकान्वये दि. ३० मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "ब" ऐवजी सुधारित परिशिष्ट "ब" निर्गमित करण्यात आले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून उपलब्ध व रिक्त पदे कळविताना श्री. प्रकाश झगा मोरे, कार्यकारी अभियंता (विद्युत) हे निलंबित असल्याची बाब नमूद करण्याचे अनावधानाने राहून गेले होते व सदर पद रिक्त दर्शविण्यात आले होते. तथापि, श्री. मोरे, कार्यकारी अभियंता यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले आहे. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २०१३ च्या सरळसेवेने विद्युत निरीक्षक या पदाच्या एकूण ८ उमेदवारांची शिफारस केली असून त्यापैकी ६ उमेदवार उर्जा विभागात व २ उमेदवारांना सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये नियुक्ती देणे आवश्यक आहे. सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये सेवानिवृत्तीने रिक्त झालेल्या २ पदांवर सरळसेवेच्या उमेदवारांना प्राथम्याने नियुक्ती देणे आवश्यक आहे.

३. सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. पद्माकर डोईजड, कार्यकारी अभियंता हे दि. ३०/०६/२०१७ रोजी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होत असल्याचे सा.बां. विभागाने कळविले आहे. त्यानुसार सदर रिक्त पदावर समावेशन करण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील परिशिष्ट "ब" मधील अ.क्र. २ येथील श्री. सुमंत नंदनवनकर, विद्युत निरीक्षक यांना दि. ३०.०६.२०१७ (म.नं.) रोजी कार्यमुक्त करण्याची विनंती सार्वजनिक बांधकाम विभागाने केली आहे. त्यानुषंगाने श्री. सुमंत नंदनवनकर, विद्युत निरीक्षक यांना दि. ३०.०६.२०१७ (म.नं.) रोजी कार्यमुक्त करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०६१९१३०५५३२७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.06.19 13:03:31 +05'30'

( भि.य.मंता )
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, विधानभवन, मुंबई
६) सर्व विधानसभा / विधान परिषद सदस्य , महाराष्ट्र राज्य
७) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (सा.बां.वि.), मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा )महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
१२) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१), मुंबई
१३) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१४) निवासी लेखाधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां.वि. मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
१६) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू) मुंबई-४०० ०७१
१७) अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षक मंडळ, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/पुणे
१८) श्री. सुमंत नंदनवनकर, विद्युत निरीक्षक यांना मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू) मुंबई-४०० ०७१ यांचेमार्फत.
१९) सर्व कार्यासने ( ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
२०) निवड नस्ती- ऊर्जा-५.